# बारा मैल लांब, आईचे प्रेम

ग्लेंडा अर्मांड



# बारा मैल लांब, आईचे प्रेम

मराठी : अश्विनी बर्वे





ती एक विशेष रात्र होती. आई भेटायला आली होती. आईने आणलेले आल्याचे गोड केक खाऊन फ्रेडरिक चे पोट भरले होते. जसा फ्रेडरिक आईच्या मांडीवर बसला, तिची ऊब आणि तिच्या गुणगुण्याचा आवाज मेणबत्तीच्या प्रकाशा सारखा स्वयंपाक घरात पसरला. माँ फ्रेडरिकने विचार केला की जेव्हा तो आई आणि बेट्सी आजी बरोबर होता, तेव्हा तो किती खुश होता. आता तो त्यांच्यापासून दूर एका जुन्या मालकाच्या घरी राहत होता. जिथं स्वयंपाक करणारी म्हातारी काकू त्याची देखभाल करत असे.

जेव्हा आईने गाणे थांबवले तेव्हा फ्रेडरिकने विचारले, “आई मी तुझ्या बरोबर का राहू शकत नाही?”



"काश, तुला माझ्याबरोबर राहता आले असते, फ्रेडरिक," आई म्हणाली. "पण तुला माहित आहे मी सारा दिवस मक्याच्या शेतात काम करते. म्हणून मी तुझी काळजी घेवू शकणार नाही."

"मी तुला भेटायला येवू शकतो का?" फ्रेडरिकने विचारले.

'"**नाही बाळा,ती जागा खूप दूर आहे."**

"किती दूर?" त्याने विचारले.

"बारा मैल दूर.''

"पण तू तर तिथून चालत आलीस ना,आई? "ओह, ते माझ्यासाठी फार दूर नाही,"आई म्हणाली. "ज्या पद्धतीने मी चालते त्यामुळे तो प्रवास छोटा करून टाकते मी."

"आई,मला सांग ना तू कशी चालते, मला सांग एवढा लांब रस्ता तू छोटा कसा करते ते?"

फ्रेडरिकने आईकडे बघितले, जेव्हा आपल्या मुळाकडे बघून ती हसली तेव्हा तिच्या डोळ्यात मेणबत्तीचा प्रकाश होता.

“माझ्यासाठी प्रत्येक मैल विशेष आहे, प्रत्येक मैल काही वेगळं करण्यासाठी असते. आता फ्रेडरिकचा आवडता भाग आला.

"पहिला मैल कशासाठी असतो, आई?” त्याने विचारले.

“पहिल्या मैलात मी विसरण्याचा प्रयत्न करते,”आई म्हणाली.

“तू काय विसरायला बघते?”

“मी विसरते की मी किती थकली आहे.मी माझ्या पाठीचे दुःख विसरते आणि माझ्या हाताच्या आणि पायाच्या वेदना सुद्धा. मी विसरून जाते की मी आज पूर्ण दिवस काम केलं आहे आणि उद्या लवकर सकाळी मला परत शेतावर काम करायला जायचं आहे.आणि जेव्हा विसरणे संपते तेव्हा मी आठवायला सुरुवात करते. दुसरे मैल आठवण्यासाठी असते.”





“दुसऱ्या मैलात तू काय आठवते?” फ्रेडरिकने विचारलं.

“मी तुला आठवते, फ्रेडरिक. मी आठवते की तुला खारुताईचा पाठलाग करणं आवडतं.मी आठवते की तू कसं जेवतो. मी आठवते की तुला कसे प्रश्न विचारायला आवडतात.”

फ्रेडरिक हसला. मग आईने त्याला आपल्याजवळ ओढले. “मी हे आठवून खुश होते की तू माझा मुलगा आहे,”ती म्हणाली.

फ्रेडरिक उठून बसला आणि त्याने आपली छाती फुगवली. “मी हेरिएट बेली चा मुलगा आहे!”

“लक्षात ठेव जेव्हा कैटी काकू तुझ्यावर रागवेल,”आईने हळूच सांगितले.मग तिने वर बघितले आणि केटी काकूचा वर चालतांनाचा आवाज ऐकला.

“तू अजून काय आठवते,आई?” फ्रेडरिकने विचारले.

“मी आवाज आठवते,”आई म्हणाली.

“म्हणजे तिसरे मैल आवाज आठवण्याचे असते का? फ्रेडरिक ने विचारले.

“हो,“ आई म्हणाली. “रात्रीचे आवाज ऐकण्यासाठी”

“तू काय ऐकतेस आई?”

“मी रातकिड्यांचा किरकिर आणि घुबडांचे आवाज ऐकते आणि झाडांवर बसलेल्या प्राण्याचा थरथराट ऐकते.”

“तुला ते आवाज समजतात?”

“हो, फ्रेडरिक,“ आई कुजबुजत म्हणाली. “जेव्हा मी रात्री आवाज ऐकते, तेव्हा मला एक वाक्य ऐकू येते, “बघ हेरिएट वर बघ.”



“मग चवथ्या मैलाला तू वर बघते? फ्रेडरिकने विचारलं.

आईने मान हलवली. “हो,तेव्हा मी चांदण्याकडे बघते.”

“किती चांदण्या आई?”

"अगणित. त्यांना मोजणे किती अवघड आहे. कधी-कधी मी त्यांना सगळ्यांना माझ्या समोर पसरलेल्या बघते. कधी-कधी त्या झाडांच्या पानांमधून मला मिठी मारतात, मी चांदण्याकडे बघते आंनी माझे मन आश्चर्याने भरून जाते.”



“तुला कशाचे आश्चर्य वाटते?” फ्रेडरिकने विचारलं.

"पाचवे मैल देवाच्या आठवणीत घालवते.तो देव ज्याने हे चंद्र-चांदण्या आणि प्राणी तयार केले आणि तुला आणि मलाही ”

“आई?"

“हो, फ्रेडरिक?"

“देवाने आपल्याला गुलाम का केले?”

“देवाने आपल्याला गुलाम नाही केले, फ्रेडरिक. आपण सगळे देवाची मुलं आहोत. लवकरच एक दिवस चांगलायेईल.”

“तुला कसं माहित?” फ्रे डरिकने विचारलं.

“कारण मी प्रार्थना करते,” आईने उत्तर दिले.



"तू सहावे मैल प्रार्थनेत घालवते?" फ्रेडरिकने हात जोडून विचारलं. "मी पण प्रार्थना करतो, आई, इसहाक काकाने मला प्रार्थना शिकवली आहे."

"जेव्हा मी एक लहान मुलगी होते तेव्हा इसहाक काकाने मला ती प्रार्थना शिकवली होती. ते बुद्धिमान आहे आणि म्हातारे आहेत. त्यांचा आफ्रिकेत जन्म झाला होता."

"आफ्रिका कुठे आहे?" फ्रेडरिकने विचारलं.

"खूप दूर," आई म्हणाली." ती चालत जाण्यासाठी खूप दूर आहे?"

"हो. माझ्या साठी सुद्धा!" आई हसत म्हणाली. "त्यासाठी एक विशाल समुद्र पार करावा लागतो."

"समुद्र किती रुंद असतो?" फ्रेडरिकने विचारलं. " तो मोजण्यासाठी खूप मोठा आहे." "आफ्रिकेचे लोक स्वतंत्र आहेत?"" ते स्वतंत्र आहेत, पण आफ्रिकेत जीवन खूप कठीण आहे.जेव्हा लोक स्वतंत्र असतात तेव्हा ते खूप मेहनत केली तरी थकत नाही. हिच प्रार्थना मी करते. फ्रेडरिक. मी प्रार्थना करते की एक दिवस आपण सगळे स्वतंत्र होवू आणि प्रार्थना झाल्यावर मला गावं वाटतं."



"सातवे मैल गाण्यासाठी असते!" फ्रेडरिक म्हणाला. "तू काय गाते, आई? उदास गीत की खुशीचे गीत?"

आईने उत्तर दिले, "माझ्या मनाला जे वाटते, ते मी गाते.गाण्याने माझा आत्मा हलका होतो. मग ते गाणं खुशीचे असो की दुःखाचे, मग मी आठवे मैल चालायला तयार होते."



"आठव्या मैलात तू काय करते?" फ्रेडरिकने विचारले.

"आठवे मैल हसण्यासाठी असते, मी आनंदाच्या बाबत विचार करते.मी चांगल्या, आनंदी वेळेविषयी विचार करते."

“कोणत्या चांगल्या वेळेविषयी आई?”

“मका कापण्याच्या वेळेस जेव्हा आम्ही पीक कापायला एक-दुसऱ्याला मदत करण्यासाठी एका शेतातून दुसऱ्या शेतात जातो, तेव्हा आम्ही बघतो की कोणती टीम सगळ्यात लवकर कापणी करते आणि मक्याचा सगळ्यात मोठा डोंगर तयार करते.तू आपल्या जीवनात मक्याचा एवढा मोठा ढीग बघितला नसेल.”

"किती उंच?" फ्रेडरिकने विचारले.

“त्याला मोजणं मोठं अवघड होईल”आई म्हणाली. पण ती वेळ मन हलके करण्याची, हसण्याची मजा करण्याची असते!मग काम संपल्यावर, खूप खाणं आणि नाचणं सुद्धा असतं.”

"नृत्य!" फ्रेडरिकने विचारलं, "आई, तू पण नाच करते?" कहा

"हो तर, मक्याचा नाच, बाज चा नाच आणि कबुतराच्या पंखाचा नाच."

फ्रेडरिक ती नावं ऐकून हसला.

"चल तुला नाचतांना बघू या, मिस्टर," आई म्हणाली. "ये, आज तुला मी कबुतराच्या पंखाचा नाच दाखवते."

ते उठले आणि मेणबत्तीच्या प्रकाशात स्वयंपाक घरात नाचू लागले. आईने आपल्या लांब हातांना फडफडवले आणि फ्रेडरिकने आपल्या छोट्या हातांना हलवलं. आईने फ्रेडरिकला वर उचललं आणि त्याला गोल-गोल फिरवलं, मग त्याला खाली ठेवण्याआधी आपल्या जवळ घेतलं.

फ्रेडरिक ला माहित होता की ते आता शेवटच्या मैला पर्यंत पोहचले आणि आई लवकरच परत जाईल. म्हणून तो शेवटच्या मैलाच्याबाबत विचारू इच्छित नव्हता. त्याला वाटलं की जर ते नाचत राहिले आणि त्याने कधी विचारलं नाही, तर त्याची आई परत जाणार नाही.



जसे आईने त्याला खुर्चीवर परत ठेवलं, आईने हळूच विचारलं, “तुला माहित आहे का नववा मैल कशासाठी आहे? फ्रेडरिक?"

“ते धन्यवाद देण्यासाठी आहे.”

“अगदी बरोबर, मी आपल्या जीवनासाठी आणि आपल्या चांगल्या आरोग्यासाठी देवाचे आभार मानते. मी तुझ्यासाठी सुद्धा देवाचे आभार मानते. फ्रेडरिक. तुझ्याकडे बघून मला आशा वाटते,”

“तर दहावे मैल आशेसाठी असते का?”

“हो फ्रेडरिक. माझ्या तुझ्याकडून खूप आशा आहेत, मला आशा आहे की एक दिवस आपण लोक एका परिवारा सारखे बरोबर राहू. जेव्हा आपण स्वतंत्र होवू.



"आई, जेव्हा आपण स्वतंत्र होवू तेव्हा काय होईल?" फ्रेडरिकने जांभई देत विचारलं.

" बघ तू अकराव्या मैलाची गोष्ट करतो आहे, ते स्वप्नं बघण्याचे मैल आहे. मी स्वतंत्र होण्याचे स्वप्नं बघते. तेव्हा आपल्या जवळ आपली जमीन असेल, आणि आपण आपले काम करू. तेव्हा कोणी गुलाम किंवा मालक नसेल. आपण आपले मालक असू. "

"तू माझ्याबाबत काय स्वप्नं बघते,आई?"

"हो, फ्रेडरिक! मी तुझ्या भविष्याच्याबाबत स्वप्नं बघते. तू खूप स्मार्ट आहे आणि एक दिवस तू कोणी मोठा आणि महत्वपूर्ण काम करशील. पण आता तुझ्या झोपण्याची वेळ झाली आहे."

"मी थकलो नाही," फ्रेडरिक म्हणाला.

"मला माहित आहे,पण आईची परत जाण्याची सुरुवात होईल."

आईन एकदा परत फ्रेडरिकला जवळ घेतलं आणि त्याच्या जवळ गेली जिथं तो फरशीवर झोपला होता. फ्रेडरिक एका पातळ, मक्याच्या पानाच्या गादीवर झोपला. आईने गुडघे टेकवले आणि त्याला एक जुने फाटलेले कांबळे पांघरले.

फ्रेडरिकच्या पापण्या जड झाल्या होत्या पण त्याने विचारले, "आई बारावे मैल कशासाठी आहे?"

"शेवटचे मैल सगळ्यात सोप्पे असते, फ्रेडरिक," आई म्हणाली.मग ती त्याचा पापा घेण्यासाठी खाली वाकली, "बारावे मैल प्रेमासाठी असते."



जेव्हा आई चांदणी रात्री बाहेर निघाली, तेव्हा फ्रेडरिक झोपला होता.

जेव्हा तो दुसऱ्या दिवशी उठला, तेव्हा फ्रेडरिक बाहेर पळाला आणि रस्त्यावर आला जिथून आई परत गेली असेल. आपल्या उदासीतही तो अजूनही आपल्या आईला अनुभवत शकत होता. त्याने त्या सगळ्या गोष्टींच्या बाबत विचार केला ज्या आईने सांगितल्या होत्या.

आईने सांगितलेल्या काही गोष्टी अशा होत्या की ज्या तो मोजू शकत नव्हता.आकाशात अगणित तारे होते, आणि समुद्र खूप रुंद होता, आणि मक्याचा डोंगर खूप उंच होता. पण एक गोष्ट तो मोजू शकत होता. फ्रेडरिक आपल्या मनातून जाणून होता की त्याच्या आईचे प्रेम बारा मैल लांब होते.

## शेवटचे शब्द

फ्रेडरिकने आपले स्वातंत्र अगदी तसेच मिळवले, जशी त्याच्या आईची अपेक्षा होती .गुलामीतून वाचण्यासाठी त्याने आपले शेवटचे नाव “बेली” बदलून “डगलस” ठेवले.त्यामुळे त्याच्या पूर्वीच्या मालकांना त्याला शोधणे अवघड होईल. फ्रेडरिक डगलसने शेवटी इतर गुलामांच्या स्वातंत्र्यासाठी काम केले आणि एक प्रसिद्ध लेखक आणि सार्वजनिक वक्ता झाले, ज्यांनी गुलामीच्या विरुद्ध आवाज उठवला. गुलामांच्या स्वातंत्र्याबाबत राष्ट्रपति अब्राहम लिंकन बरोबर चर्चा करण्यासाठी ते किती वेळा व्हाइट हाउस मध्ये गेले. जेव्हा गुलामगिरी संपली,तेव्हा डगलस महिलांच्या अधिकारासाठीच्या लढाईत सामिल झाले.

खरंतर डगलसची आई आपला मुलगा मोठा झालेला बघण्यासाठी जिवंत राहिली नाही.पण त्याला माहित होते की आईला त्याचा अभिमान वाटेल. डगलसने आपल्या सफलतेचे खूप श्रेय आपल्या आईला दिले. अधिकांश गुलामांपेक्षा हेरिएट बेली वाचू शकत होती. असं असू शकतं की आई आपल्या मालकांच्या परिवाराकडूनच वाचायला शिकली असेल. हेरिएट बेली शब्दांच्या बाबत खूप चतुर होती, आणि ती भेट तिने आपल्या मुलाला पण दिली. कदाचित त्या मौल्यवान रात्रीच्या काळात जेव्हा ती फ्रेडरिकला भेटायला येत असे. आपल्या आत्मकथेत डगलसने लिहलं की आईने त्याला एक शक्तिशाली शिकवण दिली, कि तो “कोणी बाळ नव्हते, तरी कोणाचा तरी मुलगा होता.” आईच्या प्रेमाने फ्रेडरिक डगलसला हा विश्वास दिला की तो एक गुलाम होण्यासाठी जन्माला आला नाही, तर वास्तवात काहीतरी महान काम करण्यासाठी आणि एक उल्लेखनीय जीवन जगण्यासाठी जन्माला आला आहे.

समाप्त